**आरोग्य विभागाच्या अखत्यारीतील कुंवर तिलकसिंह जिल्हा सामान्य रुग्णालय व बाई गंगाबाई स्त्री रुग्णालय, गोंदिया ही दोन रुग्णालये वैद्यकीय शिक्षण विभागाकडे हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१९/प्र.क.२७१/आरोग्य- ३**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
दिनांक: १४ मे,२०२०

**वाचा -**

१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांक :- एमईडी-२०१३/प्र.क्र.२१४/२०१३/शिक्षण-१ दि. २६ जून, २०१४
२) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक :- संवैशिवसं /शवैमवरुगों / साआवि/सा.क./१३४/अ-५/२०१८ दि. ०२.०१.२०१९
३) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्र. संआसे/कक्ष-३/बारामती/करारनामा/७७५०/१९ दिनांक ७/६/२०१९

**प्रस्तावना -**

गोंदिया येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व ५०० रुग्णखाटांचे संलग्न रुग्णालय स्थापन करण्याबाबत शासन निर्णय, दि. ०३.जानेवारी, २०१३ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासकीय महाविद्यालय प्रत्यक्षात सुरु होण्यापूर्वी भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या निकषांची पूर्तता करण्याच्या दृष्टीने गोंदिया येथील आरोग्य सेवा संचालनालयाच्या अधिपत्याखाली जिल्हा रुग्णालय, गोंदिया, १०० खाटांचे स्त्री रुग्णालय व आवारातील इतर इमारती दि. २६ जून,२०१४ रोजीच्या शासन निर्णय व त्यासोबतचे परिशिष्टात नमूद केलेल्या अटी व शर्तीनुसार वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाकडे तीन वर्षासाठी हस्तांतरीत करण्यात आले आहे. सदर महाविद्यालयाची निर्मिती होईपर्यंत सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारित असलेल्या जिल्हा रुग्णालय, गोंदिया, १०० खाटांचे स्त्री रुग्णालय व आवारातील इतर इमारती गोंदिया येथील रुग्णखाटा शैक्षिणिक प्रयोजनार्थ निशुल्क वापरण्यास उक्त शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आली आहे. तसेच शासनाने राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील प्रवेश क्षमता वाढविण्याच्या दृष्टीने गोंदिया येथे १०० विद्यार्थी क्षमतेचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व ५०० रुग्ण खाटांचे संलग्नित

रुग्णालय सुरु करण्यास संदर्भ क्र १ अन्वये मान्यता प्रदान केली आहे. भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या मानकानुसार नवीन वैद्यकीय महाविदयालय सुरु करण्याकरीता आवश्यक असलेली जागा संस्थेच्या नावे असणे बंधनकारक आहे. तथापि दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी सदर सामंजस्य करार संपुष्टात आल्याने अजून ३ वर्षाच्या कालावधीसाठी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, गोंदिया या संस्थेचे प्रस्तावित बांधकाम पूर्ण करण्याच्या अटीच्या अधिन राहून सदर सामंजस्य कराराचे नुतनीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

गोंदिया येथे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय सुरु करण्यात आले असून भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या निकषांची पुर्तता करण्याकरीता आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील कुंवर तिलकसिंह जिल्हा रुग्णालय, गोंदिया व बाई गंगाबाई स्त्री रुग्णालय गोंदिया ही रुग्णालये तेथील शासकीय महाविद्यालय यापुढे कार्यान्वित ठेवण्याकरीता वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाकडे कार्यिन्वत ठेवण्यास दि.२६ जून,२०१४ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती नुसार तसेच खालील अटी व शर्ती नुसार पुढील ३ वर्षासाठी म्हणजे १९ डिसेंबर,२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) जिल्हा शल्य चिकित्सक, गोंदिया हे तेथील नियुक्त अधिष्ठाता यांचेबरोबर करार करतील व सदर करार हा फक्त ३ वर्षाच्या कालावधी करिता असेल. त्यानंतर तो आपोआप संपुष्टात येईल. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने १९ डिसेंबर,२०२० पर्यंत भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या मानकानुसार पदांची निर्मिती व भरतीची कार्यवाही पुर्ण करावी.

२) दोन्ही रुग्णालयांमध्ये सद्या कार्यरत असलेले गट अ संवर्गातील विशेषज्ञ या सेवा वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाद्वारे विशेषज्ञ नियुक्त होईपर्यंत किंवा आणखी १९ डिसेंबर,२०२० पर्यंत प्रतिनियुक्तीवर राहतील व त्यांचा प्रतिनियुक्ती कालावधी संपुष्टात आल्यानंतर सार्वजनिक आरोग्य विभागाकडे आपोआप वर्ग होतील. त्यासाठी वेगळा शासन निर्णय काढण्याची आवश्यकता नाही. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने प्रस्तावित वैद्यकीय महाविद्यालयास लागणाऱ्या विशेषज्ञांच्या सेवा त्यांच्याकडे इतर वैद्यकीय महाविद्यालयांमध्ये उपलब्ध असलेल्या विशेषज्ञांमधून उपलब्ध करुन घेण्याची व्यवस्था करावी.

३) गट - क व गट - ड कर्मचारी, अधिष्ठाता, वैद्यकीय महाविद्यालय यांचे अधिनस्त १९ डिसेंबर,२०२० पर्यंत प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येतील. सदरची गट - क व गट - ड कर्मचाऱ्यांची आस्थापना ( प्रतिनियुक्तीच्या कालावधीत) संबंधीत रुग्णालयाचे प्रशासकीय अधिकारी / मुख्य प्रशासकीय अधिकारी यांच्या थेट नियंत्रणाखाली तसेच अप्रत्यक्षपणे अधिष्ठाता यांच्या नियंत्रणाखाली येतील.

४) प्रतिनियुक्तीच्या कालावधीतील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयामार्फत अदा करण्यात येईल. दरम्यानच्या काळात विशेषज्ञ एम.बी.बी.एस. वैद्यकीय अधिकारी व गट ब, गट क व गट ड कर्मचारी वैद्यकीय शिक्षण विभागामार्फत उपलब्ध होतील. त्यानुसार प्रतिनियुक्तीवरील कर्मचारी सार्वजनिक आरोग्य विभाग परत घेईल.

५) वैद्यकिय महाविद्यालयासाठी दि.२६ जून,२०१४ च्या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेली गट- अ ते गट-ड ची पदे संचालक, वैद्यकिय शिक्षण यांनी १९ डिसेंबर,२०२० पर्यंत भरावीत व आरोग्य विभागाकडील प्रतिनियुक्तीवरील पदे त्यानंतर सार्वजनिक आरोग्य विभागाकडे प्रत्यार्पित करण्यात यावीत.

६) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने शासकीय वैद्यकीय महाविद्यालयासाठी स्वतंत्र आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त करावा. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने नियुक्त केलेला आहरण व संवितरण अधिकारी हा प्रतिनियुक्तीवरील कर्मचारी वर्ग यांच्या वेतनासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहील.

७) सदर वैद्यकिय महाविद्यालयासाठी वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या लेखाशिर्षाखाली निधी उपलब्ध करुन घ्यावा .

८) कुंवर तिलकसिंह जिल्हा सामान्य रुग्णालय, गोंदिया व बाई गंगाबाई स्त्री रुग्णालय, गोंदिया यांचे अधिपत्याखालील दिव्यांग तपासणी मंडळ अधिष्ठाता वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय गोंदिया यांच्या अखत्यारीत राहिल. दिव्यांग प्रमाणपत्र देताना आवश्यकता भासल्यास अधिष्ठाता यांच्या अधिपत्याखालील नेत्ररोग शल्यचिकित्सा शास्त्र, अस्थिव्यंगोपचार शास्त्र, कान- नाक-घसा शास्त्र, औषधीवैद्यक शास्त्र, मानसोपचार शास्त्र इत्यादी विभागातील तज्ञ व तांत्रिक तज्ञ अभिप्राय मागणीप्रमाणे व आवश्कतेप्रमाणे उपलब्ध करुन घ्यावेत. सद्यस्थितीत "स्वावलंबन" प्रणालीचे नवीन लॉगीन आयडी व पासवर्ड मिळेपर्यंत दिव्यांगमंडळ वैद्यकीय अधिक्षक यांचे नियंत्रणाखाली राहील.

९) सुरक्षा, स्वच्छता, वस्त्रधुलाई, आहार इ. सेवा, वैद्यकीय महाविद्यालयामार्फत कार्यन्वित ठेवण्यात येतील.

१०) रुग्णालयांची सर्व यंत्रसामुग्री करार संपल्यानंतर सार्वजनिक आरोग्य विभागास यंत्रसामुग्री चालुस्थितीत सुपुर्त करावी. तसेच रुग्णालयाच्या इमारती उत्तम स्थितीत सार्वजनिक आरोग्य विभागाकडे करार संपुष्टात आल्यानंतर हस्तांतरण कराव्यात .

११) दोन्ही रुग्णालयांचे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत येणा-या सेवा (उदा.एस.एन.सी.यु ., आर.बी.एस.के.,आयुष, जे.एस.एस.के इत्यादी) व त्यासाठीचा कर्मचारी वर्ग रुग्णालय स्तरावर वैद्यकीय अधिक्षक व जिल्हा स्तरावर जिल्हा शल्यचिकित्सक यांचे नियंत्रणाखली राहतील. तथापि, या सेवांवरील तांत्रिक नियंत्रण अधिष्ठाता वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय यांचे असेल. दोन्ही रुग्णालयांचे राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या रुग्ण कल्याण समित्या ३ वर्षासाठी किंवा रुग्णालये वैद्यकीय शिक्षण विभागाकडे असे पर्यंत स्थगित करण्यात येतील. रुग्णालयाच्या इमारती सोडून इतर इमारती उदा. निवासस्थाने, कार्यालये, आयुष इमारत इत्यादी पुर्वीप्रमाणेच जिल्हा शल्यचिकित्सक यांच्याकडे राहतील. तथापि, भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या मानांकनासाठी यातील काही इमारती आवश्यक असल्यास जिल्हा शल्यचिकित्सक यांच्या सल्ल्याने त्या घेता येतील.

१२) करारनाम्यातील अटीबाबत काही वादविवाद (Dispute) निर्माण झाल्यास त्याबाबाता अंतिम निर्णय आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचा राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५१४१३२४५६४०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.05.14 15:48:11 +05'30'

**(रो.दि. कदम पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
२. मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुंटूंब कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुंटूंब कल्याण), मंत्रालय, मुंबई.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र, १/२ मुंबई,/नागपूर
६. सचिव (वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग), मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
८. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
९. संचालक, आरोग्य सेवा, १/२ मुंबई/पुणे
१०.सह संचालक (रुग्णालये राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
११.सह संचालक (अर्थ व प्रशासन ), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
१२.उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
१३.अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार, गोंदिया.
१४.जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा सामान्य रुग्णालय औध, गोंदिया
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया
१६. निवड नस्ती (आरोग्य ३)